महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित यांची दुय्यम कंपनी महाराष्ट्र इनसेक्टिसाईड्स लिमिटेड, अकोला येथील अधिकारी/कर्मचारी यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक:मकृउ ३३१५/प्र.क्र.१६७/६-ए,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक ३१ मे, २०१७

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:शासाउ १०.०९/प्र.क्र.१२१/सा.उ., दिनांक १९/१२/२००९
२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक:मकृउ ३३१३/७६८/प्र.क्र.१३७/६-ए, दिनांक २१/०५/२०१४
३) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित यांचे पत्र क्रमांक:जंतूनाशके/ एम.आय.एल./ ६ वे.आ./२०१५-१६/२२७५, दिनांक १५/०५/२०१५

**प्रस्तावना :**

उपरोक्त क्रमांक १ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये राज्यातील सार्वजनिक उपक्रमांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई अंतर्गतच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना उपरोक्त क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली आहे. या पार्श्वभूमीवर, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाची दुय्यम कंपनी असलेल्या महाराष्ट्र इन्सेक्टीसाईड्स लिमिटेड, अकोला या कंपनीतील अधिकारी/कर्मचाऱ्यांनाही सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत उपरोक्त क्रमांक ३ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार, शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांची दुय्यम कंपनी असलेल्या महाराष्ट्र इन्सेक्टीसाईड्स लिमिटेड, अकोला यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांना खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून पूर्वलक्षी प्रभावाने दिनांक ०१/०१/२००६ पासून परिशिष्ट-अ मधील रकाना क्रमांक ५ मध्ये नमूद केलेली सुधारित वेतन संरचना व ग्रेड वेतन लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतन संरचना व ग्रेड वेतन लागू केल्यास येणारा खर्च (MIL) कंपनीने स्वत:च्या उत्पन्नातून भागवावा व सदरचा खर्च भागविण्यासाठी आता अथवा भविष्यात कोणत्याही प्रकारचे आर्थिक अनुदान शासनाकडून कंपनीस (MIL) देण्यात येणार नाही.

२. महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई आणि महाराष्ट्र इन्सेक्टिसाईड्स मर्यादित, अकोला यांच्या संचालक मंडळाने या मंडळांतर्गत (MIL) ७७ अधिकारी/कर्मचाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यास सहमती दर्शविलेली आहे.

३. कंपनीतील (MIL) अधिकारी/कर्मचारी यांना सध्या देय असलेले भत्ते शासकीय कर्मचाऱ्यांना देय आणि लागू असलेल्या भत्त्याएवढे मर्यादित ठेवण्यात यावेत. शासकीय कर्मचाऱ्यांना देय व लागू असलेल्या भत्त्यांव्यतिरिक्त अन्य भत्ते कंपनी (MIL) वेगळ्या कराराने देत असेल तर ते देण्यात येऊ नयेत. शासनामध्ये जे भत्ते (पर्क्स) समकक्ष अधिकाऱ्यांना उपलब्ध आहेत तसेच कंपनीतील (MIL) अधिकाऱ्यांना देय असतील.

४. संचालक मंडळाने केलेल्या ठरावानुसार ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू केल्यामुळे येणाऱ्या आर्थिक भाराची भरपाई करण्याच्यादृष्टीने तसेच उत्पादकता व नफा वाढविण्याच्यादृष्टीने मुख्य व विभागीय कार्यालयीन कामकाजाचे दिवस व तास निश्चित करुन साप्ताहिक/सार्वजनिक सुट्टया निश्चित करण्यात याव्यात.

५. भविष्यात यापुढे जेव्हां शासकीय कर्मचाऱ्यांना महागाई भत्त्याची वाढ लागू करण्यात येईल तेव्हां ती वाढ कंपनीतील (MIL) कर्मचाऱ्यांना संचालक मंडळाच्या मान्यतेशिवाय देण्यात येऊ नये.

६. दिनांक ०१/०१/२००६ ते या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यन्तची थकबाकीची रक्कम कंपनीतील (MIL) अधिकारी व कर्मचारी यांना देण्याबाबात कंपनीने निर्णय घ्यावा.

७. संचालक मंडळाने ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करताना मुंबईतील व मुंबई बाहेरील अधिकारी/कर्मचाऱ्यांना अनुक्रमे ३०% आणि २०% याप्रमाणे घरभाडे भत्ता देण्याचा ठराव मंजूर करावा. तसेच, कंपनीच्या (MIL) अधिकारी/कर्मचारी यांना ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबत अधिकारी/कर्मचारी संघटनेसोबत करार करावा.

८. काही कारणांमुळे कंपनी (MIL) एखाद्या वर्षी तोट्यात गेल्यास जेवढा तोटा होईल त्या तोट्याइतपत वेतनातून कपात करुन तोटा भरुन काढण्याबाबतची तरतूद असलेला सुस्पष्ट करार संघटनेबरोबर केल्यानंतरच सुधारित वेतनश्रेण्या लागू करण्यात याव्यात.

९. तथापि, कामगार संघटनांनी असा करार न केल्यास कंपनीतील ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणीचा लाभ होणार आहे, त्यांच्याकडून वैयक्तिक करारपत्र घेऊन त्यामध्ये वरील अट क्रमांक ८ येथील तरतूद समाविष्ट करण्यात यावी.

१०.परिशिष्ट-अ येथे नमूद केलेली पदनामे व पदसंख्या याशिवाय कंपनिच्या आस्थापनेवर वेगळी पदनामे व पदे नाहीत हे कंपनीने प्रमाणित करावे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५१/१६/सा.उ., दिनांक ०३/०९/२०१६ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११६४७०३४६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.05.31 16:52:22 +05'30'

सोबत-परिशिष्ट-अ

**(प्र.शं. शेटे)**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा. अध्यक्ष तथा मंत्री (कृषी), महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई
३. उपमहाव्यवस्थापक, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई
४. मुख्य कार्यकारी, महाराष्ट्र इन्सेक्टिसाईड्स लिमिटेड, अकोला
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. खाजगी सचिव, कृषी मंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय,
९. खाजगी सचिव, कृषी राज्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय
१०.प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
११.उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.अवर सचिव (सा.उ.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.कार्यासन ६-ए, संग्रहार्थ/निवडनस्ती

## परिशिष्ट - अ

महाराष्ट्र इन्सेक्टिसाईड्स लिमिटेड, अकोला अंतर्गतची पदे व असुधारित वेतनश्रेणी आणि सुधारित वेतनश्रेणी दर्शविणारे विवरणपत्र

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | ५व्या वेतन आयोगानुसार असुधारित वेतनश्रेणी | ६व्या वेतन आयोगानुसार मंजूर करण्यात आलेली सुधारित वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी | ० | १२०००-३७५-१६५०० | १५६००-३९१०० GP ७६०० |
| २ | व्यवस्थापक, मंडळ सचिव आणि व्यवस्थापक (वित्त व लेखा) | ० | १०६५०-३२५-१५८५० | १५६००-३९१०० GP ६९०० |
| ३ | उपव्यवस्थापक | १ | १००००-३२५-१५२०० | १५६००-३९१०० GP ६६०० |
| ४ | सहायक व्यवस्थापक | ९ | ७४५०-२२५-११५०० | ९३००-३४८०० GP ४६०० |
| ५ | पाळी प्रभारी, समकक्ष | ० | ६५००-२००-९००० | ९३००-३४८०० GP ४४०० |
| ६ | पाळी प्रभारी, डेव्हलपमेंट रसायनवेत्ता, दर्जानियंत्रण रसायनवेत्ता | २ | ५५००-१७५-९००० | ९३००-३४८०० GP ४३०० |
| ७ | रसायनवेत्ता, पर्यवेक्षक, विक्री प्रतिनिधी, वैद्यकीय सहायक तथा रसायनवेत्ता | ५ | ५०००-१५०-८००० | ९३००-३४८०० GP ४२०० |
| ८ | कनिष्ठ लघु टंकलेखक तथा टंकलेखक | २ | ४५००-१२५-७००० | ५२००-२०२०० GP २८०० |
| ९ | कनिष्ठ पर्यवेक्षक, कनिष्ठ रसायनवेत्ता | १ | ४५००-१२५-७००० | ५२००-२०२०० GP २८०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १० | सहाय्यक व सहाय्यक विक्री प्रतिनिधी | ० | ४५००-१२५-७००० | ५२००-२०२०० GP २८०० |
| ११ | ट्रेड्समन, हाऊसमन सेफ्टी | ५ | ४०००-१००-६००० | ५२००-२०२०० GP २४०० |
| १२ | लिपिक-टंकलेखक, गोदाम लिपीक, टेलेक्स/टेली ऑपरेटर, ऑ.पॅकींग, सहा. विक्री प्रतिनिधी | ९ | ३२००-८५-४९०० | ५२००-२०२०० GP २००० |
| १३ | वाहनचालक, परिचारक, वाहनचालक तथा मदतनीस | ९ | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० GP १९०० |
| १४ | शिपाई | १ | २६१०-४००० | ४४४०-७४४० GP १६०० |
| १५ | मदतनीस श्रेणी-२, सफाई कामगार | ३३ | २५५०-३२०० | ४४४०-७४४० GP १३०० |
| एकूण पदे... | | ७७ | | |